


राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्रशासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय,
३, महापालिका मार्ग,
धोबीतलीव, मुंबई – ४००००१
रजि नं. एफ १६०९४ (मुंबई)
दूरध्वनी : २२६५३९६६ / फॅक्स : २२६३१३२५
Email rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क्र./ २०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

०१ सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

०२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

०३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

०४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# काव्येतिहास-संग्रह.

भुजतरुवनच्छायां येषां निषेव्य महौजसां
जलधिरसना मेदिन्यासीदसावकुतोभया ।
स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहम्
प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नमः कविकर्मणे ॥

राजतरंगिणी.

पुस्तक. ३. फेब्रुवारी, सन १८८०. अंक २.

हें मासिक पुस्तक

पुणें पेठ शनवार, येथें

'श्री शिवाजी' छापखान्यांत छापिलें.

किंमत ८ आणे.

# वर्गणीची पोंच.

## सन १८७८।७९ सालां पैकीं.

| | रु० | आ० |
|---|---|---|
| रा० ब० राघो० ज० वसई. ..... | ५ | ८ |
| ,, ,, मा० वा० बर्वे......... | ८ | १२ |
| रा. सा० कृ० रा० दांडेकर...... | ५ | ५ |
| ,, ,, स० मो० चितळे........ | ५ | ८ |
| ,, ,, सा० चिं० चिटणीस..... | ४ | ६ |
| ,, ,, श्री० भि० जठार........ | ५ | ८ |
| मि० बा० ना० शिंदे.......... | ३ | ६ |
| जी० डब्ल्यु. फारेस्ट........... | ११ | |
| रा० रा० से० ने० छा० सांगली... | ६ | ८ |
| ,, ,, ह० रा० रोहणखेडकर... | ३ | ६ |
| ,, ,, राय० नर० स्टेटसर्वेर... | ५ | ६ |

| | रु० | आ० |
|---|---|---|
| रा० रा० पां० ह० फाटक........ | ६ | |
| ,, ,, राम० के० बागाईतकर... | ३ | |
| ,, ,, ह० ग० करमरकर...... | ३ | |
| ,, ,, वि० र० जोशी......... | १ | ११ |
| ,, ,, दा० किस० वकील...... | ३ | ६ |
| ,, ,, न० ह० ग० बापट ..... | ५ | ८ |
| ,, ,, ग० ना० वकील........ | ३ | ६ |
| ,, ,, विष्णु० रघु० नातु....... | ३ | ८ |
| ,, ,, लक्ष्म० म० देशपांडे.... | ३ | ६ |
| ,, ,, ब० का० आग्नीहोत्री..... | ८ | १२ |

## सन १८८० साला पैकीं.

| | रु० | आ० |
|---|---|---|
| श्री० रा० रा० पंतसचिव साहेब ... | ३ | |
| रा० ब० मा० वा० बर्वे............ | ३ | ६ |
| रा. सा. कृ० राम० दांडेकर........ | ३ | ६ |
| रा० रा० लिं० बा० मायदेव....... | ३ | ६ |
| ,, ,, सखा० वि० कीर ...... | ३ | ६ |
| ,, ,, अंता० रा० हरडीकर. ... | ३ | ६ |
| ,, ,, श्रीधं० ब० पर्वते ......... | ३ | |
| ,, ,, ग० आ० खाडीलकर. ... | ३ | ६ |
| ,, ,, राव० गो० दांडेकर....... | ३ | ६ |
| ,, ,, वासु० गोविंद साठे .... | ३ | |
| ,, ,, लक्ष्म० रघु० मोडक...... | ४ | ६ |

| | रु० | आ० |
|---|---|---|
| रा० रा० बळ० ग० पोष्टमास्तर..... | ३ | ६ |
| ,, ,, पांडु० ह० फाटक......... | ३ | ६ |
| ,, ,, ब० का० आग्नीहोत्री...... | ४ | ६ |
| ,, ,, बळ० आ० दिवेकर...... | ३ | ६ |
| ,, ,, से० ट्रे० लायब्ररी........ | ३ | |
| ,, ,, बा० विना० खारकर...... | ३ | ६ |
| ,, ,, से० लि० छा० उमरावती. | ३ | ६ |
| ,, ,, से. ने. ज. छा. इचलकरंजी | ३ | ६ |
| ,, ,, ना० गो० पारनेरकर...... | ५ | |
| ,, ,, विना० रघु० जोशी........ | ४ | ६ |
| ,, ,, डाकटर सखा० अर्जुन .... | ३ | ६ |

---

BOMBAY 25TH FEBRUARY, 1880.

Dear Sir,

I read your Journal. I find that there is much in it that is to be commended. Of course your collection of Marathi poems will promote the cause of general Marathi literature. But your collection of the Materials for the History of the Marathas deserves all praise, for an authentic and a trustworthy History of the Marathas, their diplomacy, their military operations, their policy of subsidiary alliances and their development into a Maratha confederacy and the causes of its downfall, is yet to be written

M. M. KUNTE.

Assistant Prof. of Sanskrit, Elphinstone College.

# विषयक्रम.



---

* " भाऊसाहेबांची बखर लिहिणारा हा, पंढरपुरचे बडे सावकार व्यंकाप्पा नाईक दिंडोरे यांचा, दिल्ली येथील त्यांच्या पेढीवरील गुमस्ता होता. सदर दिंडोरे त्याकाळीं मोठ्या पतीचे प्रसिद्ध सावकार कोट्याधीश होते. त्यांचे वंशज हल्लीं पंढरपूर येथें आहेत. आपण " दिलनूरकर " असें बखरींत छापिलें आहे. परंतु आह्मा जवळ दोन अपुर्ण बखरी आहेत त्यांत व आपणाकडे पाडविलेलींत " दिंडोरे " असें आहे."

कृ० वि० का०

खलवत बैसले. राजे पंताजीपंतास बोलिले जे, "खानाचे हेजीब[६८] कृष्णाजीपंत हेजिबीस आले आहेत, त्यांस निरोप देऊन रवाना करितों. व तुह्मांसही अफजुलखान याजकडे रवाना करितों. तेथें जाऊन, खानाची भेट घेऊन बोलीचाली करणें. खानास क्रिया शपथ मागणें. तुह्मीं ते शपथ मागतील तरि देणें. अनमान न करणें. हरप्रकारें जावलीस घेऊन येणें. बाखेरीज सैन्यामध्यें युक्ती प्रयुक्तीनें ज्या रीतीनें शोध मनास आणावयाचा त्या रीतीनें आणा. खानाचें चित्त आमच्या बरियाबारि किंवा वाइटाबरि आहे असा शोध करणें." इतके सांगून, राजे सभेस आले. कृष्णाजी पंतास बोलावून आणिलें. राजे ह्मणों लागले कीं, "खानाची क्रिया पाहिजे. याजकरितां आमचे पंताजी गोपीनाथ यांस तुह्मीं आपणांसमागमें खानाच्या भेटीस नेणें. याजवळ हरीसंजराची[६९] आण देववणें. खानास जावलीस घेऊन येणें. काकाची भेट घेऊन येऊं. आमच्या मनांत कांहीं कपट नाहीं" असें सांगितलें. त्यांस ही गोष्ट मानली. मग कृष्णाजीपंतास वस्त्रे देऊन रवाना केलें. तसेच पंताजीपंतास वस्त्रे देऊन अफजुलखानाकडे रवानीं केलें.

त्यांणीं जाऊन खानाची भेट घेतली. खानांनीं सन्मान केला. कृष्णाजी भास्कर यांनीं अर्ज केला कीं, "शिवाजीनें हेजिबीस पंताजीपंतास पाठविले आहेत. एकांतीं बैसून बोलावें." असें सांगितल्यावरि खान एकांती बैसून, कृष्णाजीपंत व पंताजीपंत यांस बोलावून आणून, वर्तमान पुसिलें. कृष्णाजीपंत बोलिले कीं, "राजे तुह्मांपेगळे नाहींत. जसे महाराज शाहाजीराजे तसे तुह्मीं, ह्मणून शपथ दिली. राजे निर्भय होऊन जावलीस येतील. खानानें ही शंका न धरितां जावलीस यावें. त्यांची तुमची मुलाजमत होईल तुह्मी सांगाल तें ऐकतील." हा भावार्थ खानास कळल्यावरि मनांत मष्टाई* धरून शपथ दिली. खान बोलिले कीं, "राजा हरामजादा काफर.

---

६८. हजीब = वकील, दूत.

६९. "सोराचो" प्र० प्र० वरील पाठ सातारा प्रतीचा

७०. ही हकीगत मां० ड० यांणीं दिलेल्या हकीगतीहून फारच भिन्न आहे. ते म्हणतात पंताजीपंत हा खानाच्या पदरचा होता व त्याजबरोबर शिवाजीनें आपला कारकून कृष्णाजी भास्कर यास दिलें. म० प्रतींतही कृष्णाजीपंताचें नांव नाहीं. पंताजीपंत खानाकडून आला असें तेथेंही लिहिलें आहे. व पंताजीपंतास बिन्हाडास जागा दिल्यानंतर "रात्रीं एकांतीं पंताजी पंतास बोलावून आणिलें. राजे यांणीं व त्यांणीं देघांनीं व बसून आण शपथ त्यासि घालून वर्तमान पुसिलें. 'यथार्थ करोणा सांगणें. खानाचे मनांत काय आहे तें सांगणें. आम्ही तुम्ही वेगळे नाहीं. तुह्मीं शहाणे आहां. राज्याचें रक्षण तुम्हीं करणें. सर्व राज्य कारभार देतों" इत्यादि असा महाड प्रतीचा पाठ आहे. पुढें पृ० १७ टीप * पहा.

* मष्टाई = कपट.

जावली कुबैलें आगा. येथें भेटीस यावें ह्मणोन बोलावितो. यास्तव तूं ब्राम्हण मध्यस्थ होऊन शपथ देशील तरि शिवाजी राजियाचे भेटीस येईन. मुला-जमत घेऊं " त्यास पंताजीपंतीं क्रिया दिली जे " राजे तुमच्या वाइटावरि नाहींत. संदेह न धरणें. भेटीस यावयाचें करणें. " ऐसें खानास सांगून सैन्यांत लांचलुचपत देऊन, मुत्सदी वजीर यांजवळ शोध करून विचारलें. त्यांनीं सांगितलें कीं, " शिवाजी हरामजादा आहे. याशीं युद्ध करितां सांपडणार नाहीं. याजकरितां राजकारण लावून भेटी घ्यावी. [ आणि ] भेटीचे समयीं धरावा, ऐसी खानांनीं तजवीज केली [ आहे. ] " ह्मणून क-ळलियावरि दुसरे दिवशीं पंताजीपंत खानाकडे येऊन, राजियाकडे जातों ह्मणून हुकूम मागितला. खानानें बहुमान करून राजाकडे पाठविलें.

पंताजीपंत प्रतापगडास आले. राजाची भेट जाहली. तेसमयीं पंताजीपंतास घरीं जावयास निरोप दिला. रात्रीं एकले पंताजीपंत भेटीस बोलाविले. राजे व पंत दोघे बैसून आण शपथ घालून, एकांतीं वर्तमान पुसिलें कीं, " यथार्थ करिणा सांगणें. खानाच्या मनांत कसें काय आहे हें सांगणें. आम्ही तुम्ही वेगळे नाहीं. आपलें राज्य संरक्षिलें ह्मणजे सर्व कारभार तुम्हांस देतों. द्रव्यही बहुत देतों. आम्हांस वर्तमान यथार्थ सांगणें. " ऐसे घरोबियांत घेऊन राजांनीं पुसिलें. तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, " खानाच्या मनांत दुष्टबुद्धि आहे. सल्ला करून, तुह्मांस भेटीस आणून, दगा करून, कैद करून, विजापुरास धरून न्यावें ऐसें आहे. जर तुह्मांस हिंमत अ-सली तरि खानास नानाप्रकारें भेद करून जावलीस घेऊन येतों. तुम्हीं हिंमत धरून एकांतीं ऐकांगी करून मारणें आणि लष्कर सर्व लुटणें. राज्य सर्व आपलें करणें. " ऐसा विचार सांगितला [तो] राजाच्या मनांत आला. तेव्हां पंताजीपंतास पांच हजार होन बक्षीस दिले. आणि खानास सांगणें जे " राजा बहुत भितो. वांईस भेटीस यावयास धीर पुरत नाहीं. खान व-डील आहेत, मेहेरबानी करून जावलीस येऊन भेट देतात तरि आपण भे-टीस येतों. आपण यास हातीं धरून, धीर भरंवसा देऊन, पादशाहाचे मुला-जमतीस घेऊन जाऊन ऊर्जित करतील तरि थोरपण आहे. ऐसे कित्येक मज-

---

७१. कबल, कुब्बल=बळकट, कठीण.
७२. क्रिया = शपथ.
७३. करीणा=हकीकत.मजकूर,वर्तमान.
७४. एकांगीकरून=एकट्यानें?
७५. वांई हा अफजलखानाचा सुभा होता.
७६. मुलाजमत = भेट.
७७. ऊर्जित करणें = नांवारूपास आणणें, उत्तम दशेप्रत नेणें.

कूर सांगून घेऊन येणें." ह्मणोन विचार सांगोन पंताजीपंत यास रवाना केले.

ते जाऊन वांईस खानास भेटले. करीणा जाहीर केला. "राजा कैचेदिल[79] आहे. येथें भेटीस येतां शंका धरितो. तुम्हींच तेथें जावलीस चलणें, तेथें भेटीस येतील. दिलासा[80] करून बराबर घेऊन जाणें." असें सांगितलें. त्यावरून खान बहुत खुशाल होऊन, कूच करून, जावलीस रडतोंडीचा घाट उतरून आला. तो प्रतापगडाखालीं डेरे देऊन राहिले आसपास चौगर्दी[81] बारा हजार लष्कर व बंदुकी[82], आराबियाच्या[83] गाड्या, हत्ती, सुतारनाल्याच्या[84] गाड्या, जागां जागां पाणी पाहून उतरले. पंताजीपंतास गडावरि राजियाकडे पाठविले कीं, "भेटीस येणें."

त्याजवरून ते राजियासि जाऊन भेटले. लौकिक बोलणें जें बोलावयाचें तें बोलिले. एकांतीं मागती सर्व वर्तमान सांगितलें कीं, "आपण बोलल्याप्रमाणें खानास घेऊन आलों. आतां तुमची त्यांची भेटी एकांतीं खासे खासे यांची करवितों. तुम्हीं हरीफी[85] करून कार्यभाग करणें तो करावा." ह्मणोन सांगितलें. भेटीस एक दिवस आडकरून दुसरे* दिवशीं भेटावें असें केलें. "राजे गडावरून उतरावे. खानानीं गोटांतून पुढें यावें, उभयतांनीं दरम्यान डेरे देऊन खासे खासे भेटावें." ऐसा निर्वाद† करून राजाचा निरोप घेऊन खानाजवळ गडाखालीं मचीस[86] उतरून गेले. खानास वर्तमान सांगितलें. खानानेंही मान्य केलें.

मग दुसरे दिवशीं गडाखालीं राजियांनीं सदर[87] केली. डेरे बिछाने व असमानगिरी[88], तिवाशिया[89] व मोतियाच्या झालरी लाविल्या. चित्रविचित्र बांडे[90] व लोडें, गाद्या, पडगाद्या टाकिल्या. सदर सिद्ध केली. घाटमाथां लष्कर [सुद्धां] नेताजी पालकर आणविले होते त्यासि इशारत सांगोन पाठविली कीं, "उद्यां खानाचे भेटीस जातों, फत्ते करितों, आणि गडावरि येतों.

७८. वर टी० ७० पहा.

७९. कचादिल =भित्र्या मनाचा.

८० दिलासा करून=आश्वासन देऊन.

८१. चौगर्दा = चौगर्दी = चोहोंकडे, सर्व बाजूस.

८२. बंदुखी = बंदुक बाळगणारे.

८३. आराबा=तोफखाना.

८४. सुतारनाला=उंटावरील अग्नियंत्रें.

८५. हरीफी ( बी ) = शौर्य, धाडस.

* "भेटीस एक दिवस आड करून तिसरे दिवशीं भेट घ्यावी असा करार केला. प्रतापगडावरून राजे यांनीं उतरावें." म० प्र०

† "नेम" सा० प्र० 'निश्चय' म० प्र०

८६. माची ='उपत्यका तुमाचीस्यात्' मार्गे० पृ० ७ टी०३२ पाहा.

८७. सदर = कचेरी, सभास्थान.

८८. आस्मानागिरी = छत.

८९. तिवाशी = भिंती वस्त्र.

९०. बाडें = चिकाचे पडदे, कनाथी.

तेव्हां एकच आवाज गडावरि करितों. तेव्हां तुम्हीं घाटाखालीं उतरोन लष्करांत खानाच्या चालोन येऊन मारामारी करणें." तैसेच कोंकणांतून राजश्री मोरोपंत पेशवे आणाविले. त्यासही गडावरील आवाजाची* इशारत सांगितली. आपण निवडक लोक गडावरून उतरोन जागां जागां झाडींत ठेविले. आणि खासा राजियांनीं जैरीचीं[११] कुडती घातली. डोईस मंदील बांधिला त्यांत तोडा बांधिला. पायांत चोळणा घालून कास कसली. व हातांत एक बिचवा[१२] व वाघनखें[१३] चढविलें. आणि बराबर जिऊ महाला म्हणून मरदाना होता. त्याजवळ एक पट्टा व एक फिरंग[१४] व ढाल तैसाच संभाजी कावजी माहलदाराजवळ पट्टा व फिरंग व ढाल ऐसे † दोघे माणसें मर्दानीं आपणा बराबरि भेटीतें[१५] घेतलीं. वरकड आसपास धारकरी लोक लोक जागां जागां जाळींत उभे केले. आणि राजियानें स्नान करून भोजन केलें. सिद्ध होऊन गडाखालीं भेटीस जावयास उतरले.

गोटांतून भेटीस यावयास खानही सिद्ध होऊन चालले** बराबरि लष्कर हजार दीड हजार बंदुकी मुस्तेद ‡ होऊन चालिले. मोठे मोठे धारकरी लोक समागमें निघाले, चालिले, इतक्यांत पंताजीपंत पुढें होऊन अर्ज केला कीं, "इतका जमाव घेऊन गेलियानें राजा धाशत खाईल. माघारा गडावरि जाईल. भेटी होणार नाहीं. शिवाजी म्हणजे काय ! यास इतका सामान काय करावा ! राजा दोघां माणसानिशीं निकडोन येईल. तुम्हीं इकडोन दोघांनिशीं चलावें. दोघे बैसोन भेटावें. तेथें तजवीज करणें ते करा." असे सांगितल्यावरि अवघा जमाव दूर बाणाचे टपियावरि उभे राहून खासा खान एक पालखी, दोघे हुदेकरी[१६] व कृष्णाजीपंत § हेजीब असे पुढें

---

* "भांडियाची" म० प्र०

११. (जरीचें) कुडतें = कमरेपर्यंत येणारें डगलें. 'जिराचें' असें असावेंसें वाटतें. जिराचें = लोखंडाच्या कडीचें. 'जिरे-मुसौडी' म० प्र०

१२. बिचवा = विंचूच्या आकृतीची एक बांकूडा कट्यार.

१३ वाघनख = वाघाच्या पंज्याच्या आकृतीचें एक तीक्ष्ण शस्त्र. हें हाताचे पंजावर चढवून मूठ मिटता येते.

१४. फिरंग = 'फिरंगस्तुभवेदसिः' तलवार.

† मॉड० डफ म्हणतात तानाजी मालसुराच एक बरोबर होता.

१५. भेटीस = भेटीस जाते वेळीं.

** खानाकारतां झाडें तोडून रस्ता साफ केला होता पण त्या रस्त्या शिवाय दुसरे सर्व चोरस्ते व आडमार्ग बंद करून टाकिले होते.

‡ मुस्तेद = तयार. सिद्ध.

१६. हुदेकरी = कामगार, शस्त्रवाहक ?

§ हें नांव किंवा पंताजीपंताचें नांव म० प्रतींत यास्थळीं नाहीं.

चालिले. सैदबंडा ह्मणोन पटाईत एक लष्करी समागमें घेतला. पंताजी-हि बराबरि आहेत. असे सदरेंत गेले. सदर देखोन खान मनांत जळाला कीं, "शिवाजी ह्मणजे काय? शाहाजीचा लेक. वजीर यास असा जरी बिछान नाहीं! अशी मोतीलग सदर म्हणजे काय? पादशहास असा सामान नाहीं, येणें जातीचा त्यानें सामान मेळविला." असें बोलतांच पंताजीपंत बोलिला जे "पादशाई माल पादशाहाचे घरीं जाईल, त्याची इतकी तजवीज काय?" असें बोलून सदरेस बैसले. राजियास सिताब आणवणें ह्मणून जासुद हरकारे रवाना केले.

राजे गडाचे पायीं उभे होते. तेथून हळु हळु चालिले. समाचार घेतां खानाबरोबर सैदबंडा मोठा धारकरी आहे हें ऐकून, उभे राहिले. आणि पंताजीपंतास बोलावूं पाठविलें ते आले. त्यास ह्मणूं लागले जे, "जैसे महाराज तैसे खान. आपण खानाचा भतीजा होय. ते वडील. सैदबंडा खानाजवळ आहे. त्याकरितां शंका वाटते. हा सैदबंडा इतका यांतून दूर पाठवणें," म्हणोन पंताजीपंतास सांगितलें. त्यावरून पंताजीपंत [यांणीं] जाऊन कृष्णाजीपंताकडून* खानास सांगोन सैदबंडाही दूर पाठविला. खान व दोघे हुद्देकरी राहिले. तेव्हां राजेहि हिकडून जिऊ माहाला व संभाजी कावजी दोघे हुद्देकरी [यां]सहीत गेले. खानही उभा राहून, पुढें सामोरा येऊन राजियास भेटला. राजियानें भेटी देतां खानानें राजियाची मुंडी कवटाळून खांकेखालें धरिली. आणि हातींची जमदाड होती तिचे मेण टाकून कुशीस राजियाचे चालविली. तो आंगांत †जरीची कुडती होती त्याबारि खरखरली, आंगास लागली नाहीं. हें देखोन राजियांनीं डावे हातींचे वाघनख होतें, तो हात पोटांत चालवला. खानानें आंगांत झगाच घातला होता. वाघनखाचा मारा करितांच खानाची चरबी बाहेर आली. दुसरा हात, उजवे हातचे बिचवियाचा मारा चालविला. ऐसे दोन वार करून,

---

९७. पटाईत = पट्टा खेळण्यांत कुशळ, पट्टेकरी.

९८. मोतीलग = मोतीं लावलेली.

९९. तजवीज = विचार.

१००. सिताब = जलद.

१. भतीजा = [?] 'भीति न होय असें करावें' म० प्र०

* मां० ड० ह्मणतात कीं पंताजीपंत हा खानाचा वकील होता व त्याजबरोबर शिवाजीनें कृष्णाजी भास्कर यास दिलें. हें बखरीच्या लेखा विरुद्ध आहे. ह्याचा निर्णय हिवरें गांव येथील इनामदारांच्या सनद वरून होईल.

२. जमदाड = "जमदाड यमदंष्ट्र: स्यात्" रा० व्य० कोश. एक मोठे धाऱ्याची तलवार.

† वर ९१ टी० पहा. ही हकीगत बा० ४० याच्या हकीगतीहून अगदीं भिन्न आहे.

मुंडी आंसडून. चौथरियाखालें उडी घालोन निघोन गेले. खानानें गलबला केला कीं, " मारिलें ! मारिलें ! दगा दिधला ! बेगी धावा ! " असें बोलतांच भोयांनीं पालखी आणिली. आणि पालखींत घालून, उचलून चालविला. इतकियांत संभाजी कावजी माहालदार यानें भोयांचे पाए मारिले. आणि पालखीखालें भोयांत पाडिले. खानाचे डोचकें कापिलें. हातीं घेऊन राजियाजवळ आला. इतक्यांत सैदबंडा पटाईत धावला. त्यानें राजे जवळ केले. पट्याचे वार राजियावरि चालविले. तो राजियानें जिऊमाहली याजवळ आपला हुद्दियाचा पट्टा घेऊन, पट्टा व बिचवा असे कातरें करून सैदबंडा याचे चार वार *ओढिले. पांचवे हातानें राजियानें सैदबंडा मारावा तो इतकियांत जिऊ महाला याणें फिरंगेनें खांद्यावरी सैदबंडियासि वार केला. तो पट्टियाचा हात हत्यारा समेत तोडिला. आणि खानाचे शीर घेऊन राजे सिताब गडावरि, जिऊमहाला व संभाजी कावजी महालदार असे गेले.†

गडावरि जातांच एक भांड्याचा आवाज केला. तेंच गडाखालील लोक व घांटावरील लोक लष्कर व कोंकणांतून मोरोपंत व मावळे असे चौतर्फी चोहोंकडून चालोन खानाचे गोटावरि आले. आणि खान मारून शीर कापून, राजे गडावरी गेले, हो खबर कळोन कुल खानाचे बारा हजार लष्कर धास्त घेऊन अवसान-खर्स्त जाहलें, इतकियांत राजियाच्या फौजा चौतर्फा मारीत चालले. मोठें घोरादर युद्ध जाहालें. दोन प्रहर घोरांदर युद्ध जाहालें. खानाकडील मोठ मोठे वजीर व लष्करी महदीनें व उजदीन पठाण, रोहिले, सुरनीस [?] व आरबी वगैरे मुसलमान आणिक जातिवंत मराठे, धनगर व ब्राह्मण तसेच तोफेचे बैल, व कर्नाटकी प्यादे बंदुकी, आड हात्यारी रो चे वा र [?] व लो क वा र [ ! ] ये लं गे वा र [?] बाजे जातचे इटेकरी ह तु ल वे [?] तिरंदाज व छडीवाले व पटाईत व बांकाईत

३. पाय मारिले = पाय तोडले.

४. कातर = एक प्रकारचा पट्याचा हात

* "चुकाविले" म० प्र०

† अफजलखानास नवरात्रांत आश्विन शुद्ध ७ स मारिलें. अक्टोबर स० इ० १६५९.

५. भांडें = तोफ. पंधराशें लोकांची टोळी खानाबरोबर प्रतापगडानजीक आली होती तिजवर नेताजानें, व जावळी येथील सर्व सैन्यावर मोरोपंतानें हल्ला करावा असें ठरवून, शिंगाचा आवाज होतांच नेटाजीनें व तोफांचा आवाज होतांच मोरोपंतानें आपआपल्या फौजानिशीं शत्रूंवर तुटून पडावें असा संकेत केला होता.

६. खस्त = नाहींसें, नष्ट.

७ " महंमददीन व हजेदीन पठाण व रोहिले सुनी व शूर वजीर फजी मुसुलमान व जातिवंत मराठे " म० प्र०

८. बांकाईत = बांकेकरी = शिंगवाले.

व बाणाईते[9] व तोफखाना ऐसे एकंदर जम निदान करून भांडण दिधलें. मोठें क्षेत्र जाहालें. राजियाचे लष्करी लोकांनीं व मावळे लोकांनीं पाय उतारां होऊनमारामारी केल्या. हत्ती तोडिले, ते नागां ठार झाले. कित्येक हत्तीचीं पुच्छें तोडिलीं. कित्येक हत्तींचे दांत तोडिले. कित्येक हत्तींचे पाय तोडिले. तसेच घोडे एकच घारानें जिवें मारिले. तसेच खानाचे लष्करी कित्येक ठार मारिले. कित्येकांचे पाय तोडून पाडिले. कित्येकांचे दात उडविले. कित्येकांचीं डोचकीं फोडिलीं. कित्येक मेले. युद्धास आले ते मारून पाडून भुईस रगडिले. तसेंच उंटें मारिलीं. मारीत असतां रण अपार पडलें. संख्या न करवे. रक्ताच्या नद्या चालल्या. रणकंदन जालें. ऐसे मारामारी करून हत्ती, घोडे उंट व मालमत्ता व पालख्या वजीर पाडाव करून आणिले—बीतपशील.

| | |
|---|---|
| ६५ हत्ती व हत्तीणी सुमार. | ४००० घोडे सुमार. |
| ३००००० जड जवाहीर. | १२०० उंटें सुमार. |
| | ७००००० नगद व मोहोरा व होन |
| २००० कापड वोझीं. | सोनें रुपये. |
| | भांडीं तोफखाना सर्व ही घेतलें. |
| | १ कलम |

वजीर पाडाव जाहाले बीतपशील.

१ सरदार व वजीर मातवर. १ लां [कं?] बाजी भोंसले १ अजलखानाचे पुत्रें.[10] १ नाटकशाळेचे[11] पुत्र १ राजेश्री झुंजारराव घाडगे १ यां खेरीज लोक कलम १ येणें प्रमाणें पाडाव[12] केले. या खेरीजही जिन्नस, मालमत्ता, गुरें ढोरें, बैल, मबलग मत्ता पाडाव केले. भांडते लोकांनीं तोंडीं तृण धरून शरण आले त्यांसि व बायका मुलें, भट ब्राह्मण, गोर गरीब अशीं अनाथ करून सोडिले राजा पुण्यश्लोक, शरणांगतास मारीत नाहीं याजकरितां त्याचे लोकांनीं ही कित्येक अनाथ सोडिले. अफजलखानाचा लेक फजल हा पायीं चिरगुटें बांधून झाडींत पळोन गेला. तसेच कित्येक भले लोक पळोन गेले. संख्या न करवे.

ऐशी फत्ते करून जय जाहाला मग राजे याणीं खानाचे पुत्रास व सरदार पळून गेले होते त्यांस धरून आणिले.[13] राजा खांसा प्रतापगडाखालीं

९. बाणाईत = बाणवाले.
१०. फजल् महमद बिन् अफजल्.
११. नाटकशाळा = ठेवलेली स्त्री, रखेली.
१२. जिवंत धरिले.
१३. कांकडे नांवाच्या एका सरदारानें अफजलखानाच्या पुत्रास प्रथम लपवून ठेविलें होतें याबद्दल शिवाजीनें त्यास कडक शिक्षा दिली.

उतरोन कुल आपले लोक व अफजलखानाचे लोक व त्याचे पुत्र भांडते माणूस होते तितकियांस भेटून, पोठाशीं धरून, दिलासा करून, भांडते लोक जे पडले होते त्यांच्या लेंकांस चौलविलें. पुत्र नाहीं त्यांच्या बायकांस निमे वेतन करून चालवावें असें केलें. जखमी जाहाले त्यांस दोनशें होन व शंभर होन, पंचवीस होन, पन्नास होन, दर असामीस जखम पाहून दिधले. मोठे मोठे लोक धारकरी जुमले होते, त्यांस बक्षीस हत्ती घोडे दिधले. हस्तकडीं, कंठमाला, तुरे, पदकें, चौकडे, मोत्यांचे तुरे, कित्येकांस बक्षीस फार दिले. ऐसें दंणें लोकांस दिधलें. कित्येकांस गांव मोकासे बक्षीस दिधले. लोक नांवाजिले. दिलासा केला.

मागें कौरवांचा क्षय पांडवीं केला, [तेव्हां] असा वीरा वीरांस झगडा जाहाला. खांसा खान राजियानें एकांगी करून मारिला. अवजुलखान सामान्य नव्हे. केवळ दुर्योधनच जातीनें होता. आंगाचा, बळाचाही तैसाच आणि दुष्ट बुद्धीनें तैसाच. त्यास एकले भीमानें मारिला. त्याचप्रमाणें [येथे राजानें ] केलें. शिवाजीराजाही भीमच. त्यांनींच अफजुल मारिला. हें कर्म मनुष्याचें नव्हे ; अवतारीच होता, तरीच हें कर्म केलें. यश आलें. असें जाहालें. खानाकडील वजीर पाडाव केले होते त्यांस वस्त्रें, भूषणें, अश्व देऊन अनाथ[१५] करून सोडिले[१६]. त्याउपरी राजश्री पंताजीपतासही उदंड वस्त्रें, अश्व, अलंकार दिधले. अपार द्रव्यही दिधलें. खुशाली केली. राजगडास मातुश्रीस व सर्वांसही फत्तेची खबर लिहून पाठविली. त्यांनींही वर्तमान ऐकून साखरा वाटून, नगारे करणे केले. भाडीं मारिलीं. मोठी खुशाली केली. येणें रीतीनें राजियाकडील वर्तमान जाहालें.

त्याउपरी विजापुरास चवथे दिवशीं जासूद, हरकारे यांणीं खबर पादशाहास व पादशहा-जादीस जाहीर केली कीं, "अफजलखान खांसा मारून, शीर कापून नेलें. कुल लष्कर लुटून फस्त केलें." ऐसें सांगतांच अली अदलशाहा तक्तावरून उतरोन, महालांत जाऊन, पलंगावरि निजला. [त्याणें] बहुत खेद केला. असेंच पादशहा-जादीस खबर लागतांच पलंगावरि बैसली होती तेथेंच "अल्ला अल्ला ! खुदा खुदा !" ह्मणून अंग पलं-

१४. त्यांचें चाळविलें = त्यांचा परामर्ष घेतला. त्यांसही अधिकार नौकरी वगैरे दिल्ही.

१५. जेथें हा शब्द आला आहे तेथें मूळांत अनात (अजात) असें दिसतें.

१६ झुंजारराव घाडगा हा शाहाजीचा स्नेही होता. यास शिवाजीनें आपणाकडे राहण्याचा फार आग्रह केला. परंतु तो तें ऐकेना तेव्हां त्यास पोषाख देऊन निरोप दिला. पाडाव सांपडलेल्या सरदारांचा शिवाजी नेहमी चांगला मान मरातब ठेवी.

# *साष्टी ( उर्फ ठाण्या ) ची बखर.

ठाणें ह्मणजे बिंबस्थान. हें राज्य फिरंगी[1] यानें घेऊन कुबुद्ध धरिली. जमीनदारांचीं वतनें बुडविलीं. गांवांचे गांव घेऊन बाटविले. किरिस्तान[2] केले. सासष्ट[3] गांवचे व आगर वसईचे बहुतेक लोक धरून बाटविले. घरांत कोणी नसले तर पोरें नेऊन बाटवावीं. असा उपद्रव महाराष्ट्रांत मांडिला. कोणी दक्षिणेंत पळून गेले. क्रियाकर्मांतराचा लोप झाला. देवधर्म बुडाला. प्रांतांतील तीर्थें, क्षेत्रें सर्व लोपलीं. देवालयें फोडून साफ केलीं. फिरंगी यानें आपलीं देऊळें बांधिलीं. फिरंगी धर्म चालवयास लागले. ब्राह्मणास मुलखांत फिरण्याची बंदी झाली. कोणी कांहीं व्रतें, उद्यापनें, होम वगैरे आरंभिलीं ह्मणजे त्यांचें घर वेढलें. शेजारीपाझारी त्या घरांत सांपडले ह्मणजे त्यांसही धरून न्यावें. उत्छाव वगैरे चोरून जीव वांचवून [लोक] करूं लागले. मुलखांत एखादे गांवीं शेंदरासा सुपारी एवढा धोंडा सांपडला ह्मणजे तो

---

* हा " साष्टी ( ठाणें ) ची " बखर आम्हांकडे रा० ब० महादेव गोविंद रानडे यांजकडून आली. ही मूळ प्रतीची नक्कल बाळबोध लिपींत शुद्ध लिहिलेली आहे. मूळ प्रत श्री० रा० सरनाईक इनामदार अंजूर ता० भिवंडी यांजकडे असल्याचें ही आम्हांस कळलें आहे. ही मूळ प्रत मिळवितां येणार नाहीं असें नाहीं. या गोष्टीकडे आमचे मित्र आपलें लक्ष पुरवितील अशी आशा आहे.

पोर्तुगीज लोकांनीं हिंदु लोकांवर धर्माचे बाबतींत वगैरे जुलुम केला तेव्हां रयत पेशव्यांस अनुकूल होऊन त्यांस साष्टी, वसई वगैरे मुलुख कसा प्राप्त झाला ही हकीकत या बखरींत दिली आहे.

१. फिरंगी हा शब्द ' फ्रांक ' या शद्बाचा अपभ्रंश होऊन फारसी भाषेंतून मराठी भाषेंत आला. सर्व युरोपीयन राष्ट्रांचा मुसलमान लोक याच शब्दानें व्यवहार करीत असत. येथें फिरंगी म्ह० पोर्तुगीज लोक हे होत.

हे प्रथम व्यापाराकरितां स० इ० १४९८ मध्यें मलबार प्रांतांत आले. पुढें किनाऱ्या वरचा मुलुख काबीज करूं लागले. त्यांचा पहिला गव्हरनर जनरल अल्फन्सो अल्बुकर्क याणें गोंवें हें राजधानीचें स्थळ करून, आरमार वाढवून बंदरोबंदरीं किल्ले बांधण्याचें काम सुरु केलें. हा अल्फन्सो १५१५ मध्यें मरण पावला. पुढें १६०० पर्यंत पोर्तुगीज लोकांची सत्ता दिवसें दिवस वाढत जाऊन सर्व पश्चिम समुद्रावर त्यांचा दरारा व अधिकार हीं कायम बसलीं. पुढें दुसरे युरोपीय लोक इकडे कंपन्या(मंडळ्या) बनवून व्यापारा करितां येऊं लागल्यावर यांचें माहात्म्य कमी होऊं लागलें. इतक्यांत मराठ्यांची सत्ता वाढूं लागून त्यांचे व पोर्तुगीज सरकारचें नेहमीं भांडण सुरू झालें. शेवटीं साष्टी वसई ( १७३९ ) व चौल वगैरे मुलुख मराठ्यांनीं घेऊन त्यांनीं आपला अंमल सुरू केल्यावर पोर्तुगीज लोक गोंव्यास गेले. हल्लीं गोंवें पोर्तुगाल देशाच्या राजाच्या ताब्यांत आहे.

२. किरिस्तांन, किरिस्तांव, क्रिश्चिआं, हा शब्द क्रिस्त याचें अनुयायी जे क्रिस्तिअन ( क्रिश्चन ) या अर्थाच्या पोर्तुगीज शब्दाचा अपभ्रंश.

३. सहासष्ट गांव म्हणून सासष्टी, साष्टी असें नांव या बेटास पडलें.

अनुक्रमणिका

गांव नेऊन धरून बाटवावा. कोणी दुसमानगिरी करून कांहीं साक्षी उभे करावे व पाद्री जवळ जाऊन एखाद्यानें बालंट घ्यावें म्हणजे त्या गृहस्थाचें सर्व घर नेऊन बाटवावें. न्याय अन्याय पाहाण्याची रित नाहीं. असा अनर्थ मांडिला.

त्यांत पाठारे जातीचे लोक होते त्यांस फार उपद्रव करीत. वरकड शेणवी, परभू, वाणीउदमी यांस उपद्रव थोडा करीत. पहिल्यानें वांद्रें गांव अवघें धरून बाटविलें. त्यामध्यें साळोंकी म्हणून कोणी गृहस्थ होते. ते फार त्रासून, ते व त्यांचे भाऊ दोघेजण हे सर्व आपल्या मुलांबाळांसुद्धां व आपल्या हत्यारांसुद्धां कैळव्यांस[6] येऊन राहिले. तेथून अंजुरास आले. व दक्षिणेंत संभाजी[7] भोंसले राज्य करीत होता त्यांजकडे पेगर्म[8] चालविला व प्रल्हाद जोशी ब्राह्मण पाठविला. इतक्यांत संभाजी वर मोंगलानें चढाई केली. औरंगशाहा बादशाहानें संभाजी राजास धरून नेलें.[9] भोंसल्याचें सर्व राज्य विसकळीत झालें. संभाजीचा पुत्र शाहू यानें राज्य उभें केलें.[10] त्याचा बाळाजी विश्वनाथ प्रधान व श्रीपतराव प्रतिनिधी व खंडेराव दाभाडे सेनापती हे कामावर असतां निंबाजी नाईक अंजुरांत होते. यांस ६ पुत्र होते. त्यांनीं असा विचार केला कीं, आपण भोंसले यांस शरण जावें आणि आपलें राज्य सोडवावें. इतक्यांत राजा[11] मरण पावला. मग गंगाजीनाईक, वरील ६ पैकीं वडील, हा श्रीमोरेश्वरास[12] गेला. तेथें प्रसाद घेऊन कान्होजी आंगरे यांजकडे

---

४. पोर्तुगीज लोक हे 'रोमन क्याथोलिक' म्हणून जी ख्रिस्तीधर्माची मूळ शाखा, त्या शाखेचे होते. जबरदस्तीनें आपला धर्म प्रवृद्ध करावा हें त्यांचें धर्मांतील एक कलमच होतें. याकरितां 'जेसूट' नांवाचे उपदेशकांनीं एक 'इंक्विझिशन' नांवाची मोठी सभा बनविली. तिच्या शाखा मुलुखों मुलखीं स्वधर्म-प्रवृद्धीकरितां ते नेमीत असत. बंदींत टाकणें, उपाशीं मारणें, चांप लावणें, तापले तव्यावर उभें करणें, जाळणें वगैरे जे दुःख व वेदना देण्याचे अत्यंत दुष्ट उपाय तेही अमलांत आणून लोकांस बाटाविणें हा आपला धर्म असें ते मानीत. ही 'इंक्विझिशन' अर्थात् पोर्तुगीज लोकांचे इकडे राज्य स्थापन झाल्याबरोबर गागामाग आली.

५. पाद्री [ पाद्रे ] = ( पिता ) उपदेशक.

६. ठाण्याजवळ खाडी पलीकडे.

७. शिवाजीराजाचा पुत्र (१६८१-८९).

८. पेगम = प्रयत्न.

९. इ० स० १६८८|८९.

१०. शाहूची मोंगलांचे बंदांतून सुटका व त्यास राज्यप्राप्ति इ० स० १७०७|८ बाळाजी विश्वनाथ (१७०८–१७२०)

११. हा राजा संभाजी किंवा राजाराम ( मरण १७०० ) असला पाहिजे, कारण शाहू तर पुढें वसई काबीज झाल्यावर १७४९ मध्यें मरण पावला. 'इतक्यांत निंबाजी नाईक मरण पावले' असें असतें तर संगती ठीक जमती. कदाचित् नाईक यासच 'राज्य' ह्या पदावरून राजा म्हटलें असावें.

१२. 'मोरेश्वर' हें गणपतिचें महास्थान पुण्यापासून १५|१६ कोशांवर आहे.

संसर्गदोषाचा परिहार करावा. याविशीं आज्ञा लिहिली तर अवश्यक स्वामींचे आज्ञे प्रमाणें वर्तणूक करूं.

कोणी मंत्रशास्त्री भेटतील आणि कांहीं अनुष्ठान करा ह्मणतील तर ते गोष्ट न करणें, कोणाचा मंत्र न घेणें, शिवपूजन व विष्णुपूजन व गायत्रीचा जप व वेदोक्त अनुष्ठानें करीत जाणें, ह्मणून लिहिलें; तर आज्ञे प्रमाणेंच करीत जाऊं. स्वधर्में करून आचरण करणें, कोणीं दुराचरण असतील त्यांस शासन करावें ह्मणून लिहिलें; त्यास अवश्यमेव लिहिल्या प्रमाणेंच वर्तणूक करूं.

रायांचे[1] वैभवाची वृद्धी व्हावी यास्तव आपण बहुत श्रम आज पावेतों केले, पुढें जोंपर्यंत आपण आहें तोंपर्यंत तुमच्या कल्याणास्तव श्रम करावयास अनुमान न करूं ह्मणून लिहिलें; तर राऊ स्वामींस मातापित्रांचेठायीं मानीत होते, त्यांच्या कल्याणास्तव स्वामींनीं श्रम केले तर ते गोष्टीचें अपूर्व काय आहे? बालकाचें कल्याण इच्छावें हें मातापितरांस सांगावें लागतेंसें नाहीं. पुढें ही आह्मी लेंकरें स्वामींचीं आहों. आमचें कल्याण व आमची बुद्धि उत्तम कर्मांच्या ठायीं दिवसेंदिवस [लागून] यशाची अभिवृद्धि होय, ऐसा आशीर्वाद स्वामी देतीलच, व देवाची प्रार्थना करतीलच यांत संशय नाहीं

राजश्री लक्ष्मणे शंकर, बुंदेलखंडांतील, त्यांचे हातून स्वामींकडे खर्चास रवाना करवितों. तो ऐवज स्वामींपाशीं पावता होईल, तो घेऊन उत्तर त्यांजपाशीं द्यावें. ऐवजाचा अंगीकार करावा. माघारां सर्वथा पाठवूं नये.

अकरा कावडी रामेश्वरास पाठवाव्या ह्मणून आज्ञा लिहिली; ऐशियास स्वामींनीं तेथें ब्राह्मण योजून* तेथूनच कावडी अकरा रामेश्वरास रवाना कराव्या. त्यास पैका पडेल तो लिहून पाठवावा. पाठवून देऊं.

राज्यप्राप्तीकरितां पूर्वीं सत्तावीस लक्ष दूर्वा वाहिल्या आहेत. बाकी त्र्याहात्तर लक्ष राहिल्या आहेत त्याचा विध राजश्री वासुदेव[1] दीक्षितांस ठावका आहे. तेविशीं त्यांस सांगितलें असे. ते दूर्वा देवास वाहतील.

चिरंजीव नानांस[2] आमची आज्ञा मान्य असें असेल तर, त्यांचे पत्र आज

१. रायांचें = रावाचें = बाजीरावाचें. बाजीरावास या पत्रांमध्यें पुष्कळ ठिकाणीं राया, राऊ किंवा राव असें ह्मटलेलें आढळतें.

* म्ह० काशीहून.

२. पृ० ८ पत्र २ पहा.

१ हे नारायण दीक्षित यांचे चिरंजीव. नारायण दीक्षित काशीस गेल्यानंतर वासुदेव दीक्षित हे दक्षिणेंत संस्थानचे मालक झाले.

२. बाळाजी बाजीराव.

पावेतों आह्मास आलें नाहीं त्यांचे पत्र आलियावर त्यास पत्र पाठवीत जाऊं, ह्मणून लिहिलें ; तर आज पावेतों रायांनीं स्वामीचे आज्ञेचें उल्लंघन न केलें. व आह्मांस स्वामींचे आज्ञेहून दुसरें दैवत नाहीं. तोच विचार चिरंजीव नानाचा आहे. स्वामींची आज्ञा म्हणजे केवळ दैवत असेंच मानून वर्तणूक करितील. सांप्रत त्यांच्या आमच्या नांवाचें एकच विनंतिपत्र लिहिलें आहे. स्वामींनीं त्यांस आम्हांस एकच आशीर्वाद-पत्र पाठविलें तरी कार्यास येईल. चिरंजीव नानाचा आमचा काडी इतका दुसरा विचार आहे असें नाहीं.

आजपावेतों जालें तें जालें, पत्र दिलें होतें तें फिरोन घेतलें, पुढें नवें जें प्राप्त होत जाईल त्याचा दुहोत्रा घेत जावा म्हणोन लिहिलें ; तर दुहोत्राचा करार करावा असें काय आहे ? सारांश मीळ-जोड स्वामींच्या आशीर्वादें होईल. वरकड स्वामींची सेवा जे प्रकारें करणें ते प्रकारें करण्यास अंतर सर्वथा होणार नाहीं.

सारांश स्वामींचे आज्ञेचें उल्लंघन केल्यास कोण उत्तम फल पावेल ? आह्मांस तो स्वामी वेगळें दुसरें दैवतच नाहीं. हेच बुद्धि वडिलांचे आशीर्वादेंकरून स्थिर राहील हा सिद्धांत आहे. तेणेंकरून सर्व उत्तमच होईल. यांत संशय नाहीं. कृपा पाहिजे. हे विज्ञापना.

---

[ १२ ] श्री

वेदशास्त्र-संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशीं:—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशळ जाणून स्वकीय लेखन करीत असलें पाहिजे. विशेष—काल तुम्हीं गेलेस [ त ? ] त्यास तुमची त्यांची बोलीचाली होऊन काय मजकूर जाला, हें तुह्मांकडून कांहींच लिहून न आलें यास्तव आजि येथें मुक्काम करून हें पत्र तुह्मांस लिहिलें असे ; तर त्याचा जाबसाल घेऊन बोली ठीक जाली असली तर तुम्हींच लौकर येणें, अथवा काय मजकूर जाला असेल तो लिहून पाठविणें त्यासारखा विचार केला पाहिजे. आजि रात्री तुमचें कांहीं

५. या मजकुरावरून हें पत्र बाजीराव मरण पावल्या नंतर लौकरच लिहिलें असावें. याजवर चिमाजी आपाही लौकरच कैलासवासी झाले.

६. दीक्षित यांजकडून पेशव्यांनीं कांहीं ऐवज कर्जाऊ घेतला असावा असें याजवरून दिसतें.

तरी लिहिलें यावें. परंतु न आलें यास्तव मुक्काम केला. आतां पत्राचें उत्तर सत्वर पाठवणें. बहुत काय लिहिणें हे विनंती.

पौ माघ शुद्ध ४ रविवार शके १६७२.

---

[ १३ ] श्री

वेदशास्त्र-संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशी:—

विद्यार्थी बाळाजी बाजीराऊ प्रधान कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील क्षेम ताा आषाड वद्य १३ पावेतों यथास्थित असे विशेष—आपण पत्र पाठविलें तें पावले. दरगाह कुलीखान याजविशीं कित्येक प्रकार लिहिले व गाजुदीखान व राजश्री मल्हारराव होळकर व राजश्री जयाजी शिंदे यांस पत्रें लिहून पाठवावीं ह्मणून लिहिलें; तरि येविशीं पूर्वी आपण पत्र लिहून पाठविलें होतें त्यावरून पूर्वीच पत्रें लेहून पाठविलीं आहेत. तुह्मींही गुप्त प्रकारें सरदारांस पत्र लिहिणें. जे जे ये समयीं चाकरी करून दाखवितील त्यांचें बरेंच होईल यांत संशय नाहीं. आपण याचअन्वये निशा[9] करावी. भागानगराकडील[10] आपण वर्तमान लिहिलें. पुढेंही जरूर तिकडील अंतर्बाह्य ठिकाणीं लावून त्वरेनें पावते करावें. हे दिवस कामाचे फार आहेत. व नर्मदा गाजदीखान उतरले किंवा नाहीं, हेंही जलद लिहावें. कोण इकडे तिकडे हें मनास[11] आणून लिहीत असावें. बहुत काय लिहिणें हे विनंती.

पौ आषा० श्रावण शुद्ध १ शके १६७४.

---

[ १४ ] श्री

वेदशास्त्र-संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशीं:—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान—साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशळ तागाईत पौष बहुल[12] पंचमी गुरुवारपर्यंत स्वामींचे आशिर्वादें

---

७. हें पत्र कोणत्या कामाच्या संबंधें लिहिलें हें नीट समजत नाहीं.

८. निजाम उल्मुल्काचा ज्येष्ठ पुत्र जो गाजुदीखान यास हैदराबादची गादी मिळवून देण्याच्या मसलतीस अनुलक्षून हें पत्र आहे.

९. निशा = खात्री, खातरजमा.

१०. भागानगर = हैदराबाद.

११. हें मनास आणून = याजवर लक्ष ठेवून.

१२. बहुल = कृष्ण, वद्य.

करून यथास्थित जाणोन स्वकीय लिहीत असलें पाहिजे. विशेष—आपणांकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरि सविस्तर लिहीत जावें. इकडील वर्तमान तर नबाबांनीं[13] फिरंगी[14] याच्या विद्यमानें आह्मांशीं सल्ला केला. हें दुःख सर्वां अमिरांस होऊन बिघाड करावा हे इच्छा करितात. परंतु जीव कोणांत आहे? सर्वही निर्माल्य! पदरचा पैका वेंचावा, जातीनें हिंमत धरून करावेंच करावें, हे गोष्ट काळें करून कोणांतही राहिली नाहीं. खान आदिकरून सर्व[15] * * * * *

बाबुजी नाईक सातारियास जाऊन आईसाहेबांचे विचारांत मिळाले. आमचा अपकर्ष इच्छितात. उपद्रव करितात. आमच्या सरदारांकडे येऊन, बुद्धिभेद करून त्यास सातारियास न्यावे, या विचारियास आले होते. परंतु सरदार गेले नाहीं. नाईक माघारे गेले असो. नाईकांचेविशीं आमचे चित्तांत तो कांहीं नवते. असो. त्यांहीं होऊन गडबड मांडिली आहे. ते आपले कर्मानुरूप फळ पावतील. वरकड आईसाहेबांचा विचार तरि आमचे न्यून पहातात. सरदाराशीं भेदभाद करितात. मोंगलाईंत राजकारणें करितात. कोणे प्रकारें आमचें वाईट व्हावें, या विचारांत आहेत. ईश्वरच आमच्या बऱ्यावर असल्यास त्यांणीं वाईट इच्छून होणें काय? व वरकडांनीं पांचपेंच करून होणें काय? चिरंजीव रा। दादास फौजेनिशीं गुजराथेस रवाना केले ते गंगातीरांनींच गेले असतील. तिकडील मुलकाचा बंदोबस्त करून पुढें जातील. आह्मी ह र प न व ली [?] समीप पावलों. श्रीरंगपट्टण, सोंदे, बिदरूकी [हीं] स्थळें पैकियाचीं आहेत. एकाएकीं भलती गोष्ट आम्ही करीत नाहीं. कां कीं मागील पेंचपांच बहुत आहेत. मागील अर्थ पाहून जसजसा विचार करणें तसा करितों. आपले

१३. नबाब = सलाबतजंग.

१४. फिरंगी = फ्रेंच सरदार बसी. बुसीचें हैदराबादचे दरबारांत फार प्राबल्य असे.

१५. येथें मूळांत सुमारें दीड ओळ मजकुराची जागा कोरी टाकिलेली आहे.

१६. बारामतीकर. हे पेशव्यांचे नातलग असून धनकोही होते. बाजीराव मरणपावल्यावर बाबुजी नाइकास पेशवाई द्यावी अशी रघुजी भोसल्यानें शाहूच्या दरबारीं बरीच खटपट केली, परंतु ती सिद्धीस गेली नाहीं. तेव्हांपासून नाईक व भोसला हे दोघे ही बाळाजीचा द्वेष विशेष करूं लागले.

१७ आईसाहेब = ताराबाई. शाहू वारल्यानंतर हिचा नातू रामराजा सातारच्या गादीवर बसला. परंतु बाई मोठी खबरदार बायको असल्यामुळें स्वतः राज्यकारभार पाहवा व पेशव्यांची सत्ता काढून टाकावी म्हणून तिणें बरीच ढवळाढवळ केली. ह्या गोष्टीस उद्देशून वरील लेख आहे.

१८. गंगा = गोदावरी. ही दादांची सन १७५३।५४ मधील स्वारी असावी.

१९. यावरून हें पत्र कर्नाटकीं स्वारीस गेले असतां लिहिलें असें होतें.

[ काव्येतिहास-संग्रह. ]

२

# भाऊ साहेबांची बखर.

ही अनेक प्रतींवरून शुद्ध करून अर्थनिर्णायक व अवांतर
माहितीच्या विपुल टीपांसह

काव्येतिहास-संग्रह-कर्ते

यांणीं

प्रकाशित केली.

" हतोवा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् "
भगवद्गीता.

पुणें येथें

'श्री शिवाजी' छापखान्यांत छापिली.

डिसेंबर १८७९.

अनुक्रमणिका

श्री

महाराष्ट्राच्या इतिहासाचा व भाषेचा आस्था-
पूर्वक अभ्यास करूं पाहणाऱ्या स-
ज्जनांस हा ग्रंथ परम
प्रीतीनें अर्पण
करितों.

ग्रंथ-प्रकाशक.

अनुक्रमणिका

आर्या

जेव्हां स्वपदा गेला, पुसुनि तुतें राम महिवरेश तदा ॥
या परम भक्त वत्सल । हृदयस्थ ** गहिवरे शतदा ॥ ३६ ॥
प्रभुसि वहातां करितो । जें असतें पाप भस्म देवना तें ॥
स्तव तव समर्पिला हा । करु ताप हरूनि अस्मदवनातें ॥ ३७ ॥
जेथें प्रभुचें कीर्तन । तेथें तूं वससि हस्त जोडून ॥
मोडून मन चि अन्य । व्यवहार समस्त सर्व सोडून ॥ ३८ ॥
सु समर्थ श्रीराम-प्रभुचें भक्त-रत्न कीं नाम ।
तुमचा चि भरंवसा मज । आहे बहु सफळ करितसा काम ॥ ३९॥
कर्माकडे न माझ्या । प्रभु-भक्ता आपणा कडे चि पहा ।
न क्षुधित बाल-कर्णीं । मातेचा शब्द या पेडे "चिप" हा ॥४०॥
इति श्रीमद्राम-नंदन-मयूर-विरचिता हनूमन्नुतिः संपूर्णा ।

---

# दुर्वासभिक्षा*

## आव्या.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीमद्वेदव्यासचरण ॥ ज्ञान देती करितां स्मरण ॥ संसार पंकांतुनि उद्धरण ॥ केलें येणें विश्वाचें ॥ १ ॥ रचिला जयनामें इतिहास ॥ चतुर्वर्गाचा निवास ॥ श्रवणपठणें भाविकास ॥ भवसागरीं तारितो ॥ २ ॥ सर्व श्रुति सर्व स्मृति ॥ जीं जीं शास्त्रें पुराणें असती ॥ त्या सकळांतें महामती ॥ भारता माजी सांठवी ॥ ३ ॥ शब्दब्रह्मसागर मथिला ॥ अमृतें इतिहासकलश भरिला ॥ साधु शिष्यांच्या हातीं दिधला ॥ जाड्य-रोगार्तां पाजाया ॥ ४ ॥ विष्णुयशक्षीरसागर ॥ भक्तमहिमासुधाकर ॥ वर्णिला व्यासदेवें सादर ॥ रस जाणती जाणते ॥ ५ ॥ अधर्में दुर्योधन क्षय ॥ पावे धर्में धर्म जय ॥ संकटीं देव करुणालय ॥ दास रक्षी हें कथिलें ॥६॥ जऱ्ही सहाय झाला देव ॥ आलें घरा महावैभव ॥ तऱ्ही आसक्त मनोभाव ॥ नसावा हें कळविलें ॥ ७ ॥ झालें राज्य निष्कंटक ॥ तऱ्ही धर्म पावे शो-

---

१ राज-श्रेष्ठ. २ पुण्य विशेष. ३ आमचें रक्षण.

* "ब्राह्मण महिमा" असें नांव या प्रकरणास जास्ती शोभलें असतें. १ भारत. २ चंद्र.

क ॥ त्यासि सांगे भीष्म विवेक ॥ पर्वद्वयविस्तरें ॥ ८ ॥ शांतिपर्वी आपद्धर्म ॥ राजधर्म मोक्ष-धर्म ॥ आनुशासनिकीं दानधर्म ॥ उपदेशिले विस्तरें ॥ ९ ॥ चतुर्वर्गाचा विवेक ॥ पर्वद्वयीं आलौकिक ॥ श्रवणमात्रें नासे शोक ॥ ऐसें कौतुक उपदेशी ॥ १० ॥ दानधर्मी आधी अंती ॥ कथिली हरिहरांची भक्ति ॥ स्पष्ट जाणती महामती ॥ अभेद शुद्ध प्रसाद ॥ ११ ॥ श्रीमद्विष्णुसहस्रनाम ॥ शेवटीं सांगे साधूत्तम ॥ त्या ही वरी बोले परम ॥ प्रेमें ब्राह्मण-माहात्म्य ॥ १२ ॥ व्यास पराशर वसिष्ठ ॥ वाल्मीकी गाधिज ऐसे ऋषिष्ठ ॥ श्रवण करिती परम श्रेष्ठ ॥ श्रुतिस्मृतींचे सागर ॥ १३ ॥ जान्हवी देवी ज्याचें पाद्य ॥ जो कीं उपनिषत्प्रतिपाद्य ॥ ऐको बैसे तो जगदाद्य ॥ वासुदेव ही त्या कथा ॥ १४ ॥ धर्म विचारी जोडुनि हस्त ॥ भीष्म निवारी संशय समस्त ॥ प्रश्नोत्तरें बहु प्रशस्त ॥ उदार वक्ता श्रोता ही ॥ १५ ॥ समीप जाणोनि निधन ॥ पिता जैसें आपुलें धन ॥ पुत्रहस्तीं सावधान ॥ असतां अर्पी प्रेमानें ॥ १६ ॥ तैसें देवैव्रतें निर्मल ॥ धर्मासि कथिलें ज्ञान अखिल ॥ केलें इतरांचें ही कुशल ॥ धर्मनीतीनिपुणानें ॥ १७ ॥ धर्म ह्मणे गा अतुळप्रतापा ॥ ज्ञानसागरा कुरु कुळदीपा ॥ पितामहा मायबापा ॥ धन्य झालों उपदेशें ॥ १८ ॥ आतां पुसतों महाराजा ॥ उरला एक संशय माजा ॥ तो दूर करीं महाभुजा ॥ तुज भागविलें उदंड ॥ १९ ॥ पूज्य वंद्य मुख्य कोण ॥ कोणा वंदिसी तूं आपण ॥ एवढें सांगोनि करी निपुण ॥ मजला पूज्य पूजनीं ॥ २० ॥ भीष्म ह्मणे भला गा पुत्रा ॥ बरा प्रश्न केला पवित्रा ॥ सद्गुणभ्रमरांच्या शतपत्रा ॥ योग्य पुससी धर्मज्ञा २१ सर्वां मध्यें पूज्य ब्राह्मण ॥ हें तूं निश्चयें करूनि जाण ॥ वाहतों पुत्रा तुझीच आण ॥ संशय कांहीं न धरावा ॥ २२ ॥ ब्राह्मणांचे नमितां पाय ॥ आयुष्याचा नाश न होय ॥ यांच्या ठायीं जैसा तनय ॥ धरोनि विनय वर्तावें ॥ २३ ॥ ब्राह्मणांची सेवा नौका ॥ भवसागरीं तारिते लोकां ॥ यांचे पाय जोडितां धोका ॥ काळाचा ही असेना ॥ २४ ॥ सर्वविद्याकळाधर ॥ अनर्घ्यसद्गुणरत्नाकरें ॥ यांतें ब्रह्माहरिहर ॥ परमादरें पूजिती ॥ २५ ॥ ब्राह्मण देवांचे ही देव ॥ आम्ही पत्नी ब्राह्मण धव ॥ यांच्या आश्रयें गौरव ॥ क्षत्रिय सर्वत्र पावती ॥ २६ ॥ ब्राह्मणवर्ण हें मस्तक ॥ इतर हस्तपादादिक ॥ असो राजा अथवा रंक ॥ गतमस्तक तें शव ॥ २७ ॥ शोभा पराक्रम जीवन ॥ लोकांत जसें मस्तकाधीन ॥ तैसें नसतां ब्राह्मणभजन ॥ अमंगळ वर्ण सर्व ही ॥ २८ ॥ ऐक धर्मा कथा आतां ॥ पूर्वी; अर्जुनें भ-

---

३ भीष्म. ४ कमळ. ५ चंद्र. ६ अमूल्य. ७ सागर. ८ पति. ९ सहस्रार्जुनें.

जला दत्ता ॥ वरसामर्थ्यें आली सत्ता ॥ सागरांत पृथ्वीची ॥ २९ ॥ तो सहस्रार्जुन पावे गर्व ॥ मानी तुच्छ लोक सर्व ॥ ह्मणे श्रेष्ठ मी मज गौरव ॥ विप्रांहुनी बहु योग्य ॥३०॥ ब्राह्मण माझ्या आश्रयें ॥ न पावती संसारीं भयें ॥ यांचा पाळक मी निश्चयें ॥ गोप जैसा पशूंचा ॥ ३१ ॥ तें ऐकतां कोपला पवन ॥ ह्मणे तूं केवळ ज्ञानहीन ॥ अर्जुना हो सावधान ॥ बोलतां जिव्हा झडेल ॥ ३२ ॥ मूर्खा ब्राह्मण भास्कर ॥ तूं खद्योत पामर ॥ आपला आपण बडिवार ॥ करितां लज्जा तुज नसे ॥ ३३ ॥ अर्जुन ह्मणे रे तूं कोण ॥ ब्राह्मणमित्रा दावीं वदन ॥ येरी ह्मणे मी पवन ॥ देवदूत गर्विष्ठा ॥ ३४ ॥ हैहेय[11] ह्मणे रे पवना ॥ फार वाखाणीसी ब्राह्मणा ॥ कोण तो गु्‍ तुझिया नयना ॥ ज्यांचा आला अद्भुत ॥३५॥ बोलसी धरूनि विप्रपक्ष ॥ आपलें तरी महत्व रक्ष ॥ गोष्टी सांगोनि काय लक्ष ॥ ब्राह्मण प्रत्यक्ष याचक ॥ ३६ ॥ वायु ह्मणे रे कृतघ्नवरा ॥ पावलासि ज्या पासूनि वरा ॥ तो दत्त कोण पामरा ॥ गुरूचा विसर नसावा ॥ ३७ ॥ ऐक ब्राह्मणांचें बळ ॥ मग तूं वर्णी क्षत्रियकुळ ॥ श्रवणा योग्य नव्हसी खळ ॥ परी सांगावें लागलें ॥ ३८ ॥ पूर्वीं अंगराज यजमान ॥ कश्यपाला पृथ्वीदान ॥ देवूं ह्मणे तें जाणोन ॥ दुःख पावी[12] मेदिनी ॥३९॥ कन्या न शिवे वृद्धा वरा ॥ तैसी कश्यपाला धरा ॥ ह्मणे देतां जाईन घरा ॥ ब्रह्मदेवा पितयाच्या ॥ ४० ॥ तें कश्यप समजे मनीं ॥ अंतरीं शिरोनि ते मेदिनी ॥ तीस सहस्र वर्षें मुनी ॥ धरिता झाला निज तेजें ॥ ४१ ॥ बाहेर जैसा तैसा चि होता ॥ कोण्हा न कळतां देवापितौ ॥ ऐसें कौतुक दावूनि चित्ता ॥ त्या पृथ्वीच्या लाजवी ॥ ४२ ॥ मग ती धरणी जोडी हात ॥ करी लाजोनि पणिपात ॥ चुकलें कन्या मी तूं नात ॥ क्षमा समर्थें करावी ॥ ४३ ॥ काश्यपी भूमि यास्तव ह्मणती ॥ ऐसा कश्यप उदारकीर्ति ॥ कोणा क्षत्रियाची शक्ति ॥ ऐसी असे तूं सांगें ॥ ४४ ॥ सोमें पूर्वीं आपुली कन्या ॥ दिल्ही उतथ्या विश्वमान्या ॥ भद्राभिधाना परम धन्या ॥ रूपें गुणें अप्रतिमा ॥ ४५ ॥ ती खेळतां उपवनीं ॥ वरुणें नेली चोरूनि ॥ तें जाणोनि नारदमुनी ॥ उतथ्यातें जाणवी ॥ ४६ ॥ उतथ्य ह्मणे नारदा ॥ तूं च जावूनि सांग त्या मंदा ॥ आकंठ भक्षितां विषकंदा ॥ कोणी नाहीं वांचला ॥ ४७ ॥ नारद सांगे तथापि वरुण ॥ न सोडी जैसी गांठी कृपण ॥ ह्मणे सुधापात्र कोण ॥ तृषाक्रांत त्यागील ॥ ४८ ॥ झाला संग मिळालें मन ॥ वियोग न सोसे अर्धू क्षण ॥ नारदस्वामी तुह्मी

---

१० काजवा. ११ सहस्रार्जुन. १२ पृथ्वी. १३ कश्यप. १४ अमृत.

सुजाण ॥ समजावूनी जा सांगा ॥ ४९ ॥ नारद सांगे उतथ्यापासीं ॥ देत नाहीं भद्रा पैंशी ॥ सामें वदतां मज कंठासी ॥ धरूनि वरुणें लोटिलें ॥५०॥ कोपें खळवळला उतथ्य ॥ ह्मणे अयुष्य सरलें तथ्य ॥ तरीच आग्रहें सेवितो अपथ्य ॥ वारितां ही सद्वैद्यें ॥ ५१ ॥ मग त्या उतथ्यें मुनिराजें ॥ आपुल्या महातपस्तेजें ॥ केलें कौतुक तें सहस्रभुजें ॥ अर्जुना त्वां परिसावें ॥ ५२ ॥ सहा लक्ष [१५]हैदां भीतरी ॥ होती वरुणाची जी पुरी ॥ त्या उदकातें शुष्क करी ॥ कल्पक्षयीं रवि जसा ॥ ५३ ॥ वरुणपुरातें सागर ॥ सोडूनि पळे बहु सत्वर ॥ दुराचारीयाचा सेजार ॥ सोडी जैसा सज्जन ॥ ५४ ॥ तेव्हां वरुणाचे आप्त जन ॥ ह्मणती द्यावें ब्राह्मण-धन ॥ हटें न देतां आमुचें जीवन ॥ शोषील तो काळार्क ॥ ५५ ॥ तथापि जळेश्वरें न सोडी लोभा ॥ उतथ्यमुनी करी क्षोभा ॥ ह्मणे मूर्खा काय शोभा ॥ तुज जायाच्या भूषणें ॥ ५६ ॥ त्या वरुणाच्या पुरी प्रती ॥ जात होती सरस्वती ॥ तीतें ह्मणे तो मुनिपती ॥ सोडूनि देश हो गुप्त ॥ ५७ ॥ आज्ञा मुनीची मस्तकीं वंदी ॥ गुप्त होय सरस्वती नदी ॥ जळाचा लेश उरों नेदी ॥ [१८]ऊखर केला तो देश ॥ ५८ ॥ ऐसा होतां निर्जळ देश ॥ भय पावला नदीनदेश[१९] ॥ मस्तकीं धरी मुनि-निदेश ॥ सामर्थ्य कांहीं चालेना ॥ ५९ ॥ अद्यापि मैरुदेश निर्जळ ॥ तेथें पूर्वी वरुण-स्थळ ॥ रूक्ष झालें धरणी-तळ ॥ मुनींद्राच्या प्रतापें ॥ ६० ॥ वरुणें भद्रानामक सती ॥ नेऊनि अर्पिली उतथ्या प्रती ॥ वंदूनि ह्मणे कोप चित्तीं ॥ शरणागताचा न धरावा ॥ ६१ ॥ उतथ्य म्हणे अगा वरुणा ॥ भिवों नको केली करुणा ॥ पंगू म्हणों नये अरुणा ॥ अंधकारें सर्वथा ॥ ६२ ॥ कोठें गेला वीर्यमद ॥ जेणें अपमानिला नारद ॥ पुढें तरी ब्राह्मणपद ॥ अभयप्रद स्मरावें ॥ ६३ ॥ बळवंताचें निज धन ॥ पोटिशीं धरूनि करितां यतन ॥ न जिरे केलिया हो रोदन ॥ लोक हांसती ऐकोनी ॥ ६४ ॥ माझी पत्नी म्यां साधिली ॥ तुझी शक्ति वायां गेली ॥ जा तुज वरी म्यां दया केली ॥ ऐसें ह्मणे उतथ्य ॥ ६५ ॥ ऐसें उतथ्याचें तेज ॥ अर्जुना म्यां कथिलें तुज- ॥ तूं ही बोलावें बाहुजें[२१] ॥ ब्राह्मणांहुनि जो श्रेष्ठ ॥ ६६ ॥ अगस्त्यब्राह्मणाचा महिमा ॥ आतां परिसावा नृपोत्तमा ॥ असुरीं जिंकिला सूत्रामों[२२] ॥ सर्व देवां समवेत ॥ ६७ ॥ फिरती देव धरणी वरी ॥ भ्रष्टैश्वर्य मानवा परी ॥ स्वधास्वाहाभाग[२३][२४] अरी ॥ बलात्कारें भोगिती ॥ ६८ ॥ अगस्त्यासि गेले शरण

---

१५ वरुण. १६ डोह. १७ वरुण. १८ उकिरडा. १९ वरुण. २० मारवाड. २१ क्षत्रिय. २२ इंद्र. २३ पितृभाग २४ हविर्भाग.

धरिती माथां मुनीचे चरण ॥ सांगतां दुःख तो सकरुण ॥ अभय देता जाहला ॥ ६९ ॥ तृणा मध्यें जैसा अनळ ॥ पेटला कोपें महाबळ ॥ गगना पासूनि जैसे टोळ ॥ जाळूनि पाडी अतुरातें ॥ ७० ॥ कांहीं राहिले दानव शेष ॥ सेविती धाकें दक्षिण देश ॥ कोपला जाणों व्योमकेशें[25] ॥ त्रिपुरावरी देवार्थ ॥ ७१ ॥ कांहीं होते धरणीतळीं ॥ अश्वमेध-यज्ञस्थळीं ॥ त्यांतें यजमान तेव्हां बळी ॥ अभय देता न हला ॥ ७२ ॥ ते मात्र वांचविले दानव ॥ ऐसा अगस्त्याचा प्रभाव ॥ ऐसा कोणी महानुभाव ॥ क्षत्रिय कोठें सांगपां ॥ ७३ ॥ वसिष्ठाचा महिमा नृपा ॥ ऐक सांगतों करूनि कृपा ॥ खलीनाम दानव प्रतापा ॥ ब्रह्मवरें पावले ॥ ७४ ॥ होतां ब्रह्मदेवाचा वर ॥ तेणें अमृत सरोवर ॥ ज्यांत बुडवितां शव सत्वर ॥ जिवंत होय क्षणमात्रें ॥ ७५ ॥ देव करिती दीर्घसत्र ॥ व्रतनियमें ते कर्शित-गात्र ॥ जाणोनि त्यांतें ते अमित्र ॥ ह्मणती व्यसनीं मारावे ॥ ७६ ॥ खलीदानव महावैरी ॥ घेऊनि धांवले मोठे गिरी ॥ देव समरीं परम घोरीं ॥ जे जे मृत्यु पावले ॥७७॥ सरोवरीं टाकिती प्रेत ॥ तत्क्षण होती ते जिवंत करिती निर्जरांचों घात ॥ संकट मोठें मांडलें ॥ ७८ ॥ इंद्रास शरण गेले सुर ॥ ह्मणती काय करावा विचार शक्र ह्मणे मुनीश्वर ॥ वासिष्ठ आह्मां रक्षील ॥ ७९ ॥ वसिष्ठा प्रति ह्मणती रक्षीं ॥ केला पराभव विपेक्षीं ॥ आमुच्या सेनांचिया लक्षीं ॥ समर्थ नाहीं एक ही ॥ ८० ॥ वसिष्ठ ह्मणे धरा धीर ॥ रक्षील सर्वांसि सर्वेश्वर हे काय मज पुढें पामर ॥ पहा तपःसामर्थ्य ॥८१॥ कोपला साक्षात्प्रळयरुद्र ॥ खवळला कल्पांतीं समुद्र ॥ दग्ध केले सर्व हा क्षुद्र ॥ मुनीश्वरें ते असुर ॥ ८२॥ कैलासासि जातां गंगा ॥ मुनीश्वरें ती महाभागा ॥ आज्ञापिली सरोवरभंगा ॥ करावया ते काळीं ॥८३॥ गंगेनें तो सरोवर ॥ येऊनि भंगिला सत्वर ॥ सरयूनाम पावे सुर ॥ मुनीश्वरातें वर्णिती ॥ ८४ ॥ रक्षिले वसिष्ठें सेंद्र देव ॥ ऐसा अद्भुत विप्र-प्रभाव ॥ ऐसा कोण्ही भूमिर्धव ॥ असेल तरी सांग तूं ८५ अत्रिचें हा तपोवीर्य ॥ रक्षी देवांचें ऐश्वर्य ॥ तें चि आतां महाश्चर्य ॥ अर्जुना तुजला सांगतों ॥८६॥ देवां दानवासीं रण ॥ पूर्वी होय लोमहर्षण ॥ राहूनें केलें तेज क्षीण ॥ चंद्रार्कांचे प्रतापें ॥ ८७ ॥ तेव्हां पडलें निबिड तम ॥ देव पावले समरीं भ्रम ॥ दानवांहीं न करितां श्रम ॥ सहजें सुर जिंकिले ॥८८॥ करिती अत्रीची प्रार्थना ॥ ह्मणती स्वामी तपोधना ॥ अभय द्यावें अमरजना ॥ नेलें दानवीं यश सारें ॥८९॥ अत्री भास्कर सुधाकरें[30] ॥ स्वयें होय तपःसागर ॥ प्रथमरूपें मुनीश्वर ॥ दानवांशीं झगटला ॥ ९० ॥ प्रकाश

---

२५ शिव. २६ देव. २७ शत्रु. २८ पति. २९ शहारे येण्यासारखे. ३० चंद्र.

केला नाशिलें तिमिर ॥ दानवासीं करितां समर ॥ देव ही झाले युद्धीं समोर ॥ मारिले शत्रु प्रतापें ॥ ९१ ॥ रक्षिले देव केला विजय ॥ झाला दानवांचा क्षय ॥ चंद्रार्क पावले बलोदय ॥ सुरसमुदाय तोषविला ॥९२॥ अग्नी सहा_य तपोधन ॥ चर्मवल्कल ज्याचें वसन ॥ फळभक्षणें रक्षी प्राण ॥ त्याचें सामर्थ्य हें ऐसें ॥ ९३ ॥ ऐसा क्षात्रियांत कोणी ॥ असेल तरी बोल वाणी ॥ किंवा जोडूनि दोन्ही पाणी ॥ च्यवनप्रताप परिसावा ॥ ९४ ॥ अश्विनी कुमार सोमपान ॥ करोत ऐसें म्हणे च्यवन ॥ शक्र म्हणे एवढें वचन ॥ आ-ह्मां पासीं न चाले ॥ ९५ ॥ येरी ह्मणे आमुचा बोल ॥ कल्पांतीं ही नोहे फोल ॥ सूर्यपुत्रे[32] हे ही सुशील ॥ योग्य सोमप्राशनीं ॥ ९६ ॥ न ये इंद्राच्या तें मना ॥ करावया च्यवनाच्या हनना ॥ झाला सिद्ध निर्दय-मना ॥ पर्वत-वज्र घेऊनी ॥ ९७ ॥ च्यवनें प्रोक्षोनि मंत्रित अंभें[33] ॥ केला शक्राचा भुज-स्तंभ ॥ ज्याणें वधिलें पाकजंभ[34] ॥ मंत्रे तो शक्र खिळिगेला ॥ ९८ ॥ निर्मिला मंत्रप्रतापें मद ॥ कृतांतारिखा अति उन्मद ॥ ज्याचे शत योजन रद[35] ॥ दंष्ट्रीं[36] द्विशत योजनें ॥ ९९ ॥ तेणें ऐसें पसरिलें मुख ॥ देवां सहित शतमख[37] ॥ जिव्हां मुळीं पहिला धाक ॥ होय सर्व लोकांसि ॥ १०० ॥ शक्रासि ह्मणती समय अमर ॥ करावा मुनिला नमस्कार ॥ आग्रह करितां सहपरिवार ॥ भस्म आतां होतसों ॥ १०१ ॥ इंद्रें दोन्हीं कर जोडुनी ॥ नमस्कारिला च्यवन मुनी ॥ सोमपानीं त्या पासुनी ॥ योग्य केले सुरवैद्य ॥ १०२ ॥ मदाचे केले भाग च्यारी ॥ अक्ष[38] मृगया पान[39] नारी ॥ येथें ठेवी ह्मणोनि चतुरीं ॥ व्यसन चतुष्टय न धरावें ॥ १०३ ॥ ऐसा क्षत्रिय महाभाग ॥ असेल तरी अर्जुना सांग ॥ वृथा गर्वभारें उत्तमांग[40] ॥ सिणवावें हें अनुचित ॥ १०४ ॥ जेव्हां मदें गिळिले देव ॥ तेव्हां कपनामक दानव ॥ हरिती देवांचें वैभव ॥ धरा हरिली च्यवनानें ॥ १०५ ॥ ब्रह्मा विनाविला अमरीं ॥ आह्मीं अशक्त कपांच्या समरीं ॥ संकट नाशीं उपदेश करीं ॥ पदच्युत जाहलों ॥ १०६ ॥ ब्रह्मा ह्मणे परित्राण ॥ तुमचें करितील सुब्राह्मण ॥ त्यासि जावें सत्वर शरण ॥ माथां चरण धरावे ॥ १०७ ॥ अमरीं धावोनि धरितां पाय ॥ ब्राह्मण ह्मणती सांगा काय ॥ दिधलें मागाल तें अभय ॥ आहे बोला हृद्गत ॥ १०८ ॥ देव ह्मणती दानव कप ॥ त्यांहीं हरिलें त्रिविष्टप[41] ॥ आमचा न चाले प्रताप ॥ तुह्मीं सकृप व्हा आतां ॥ १०९ ॥ ब्राह्मणांहीं दिलें अभय ॥ केला कपक्षय निश्चय ॥ कळतां दानवांहीं सामनय ॥ तेथें कांहीं योजिला ॥११०

---

३१ हस्त. ३२ अश्विनीकुमार. ३३ उदक. ३४ राक्षस विशेष. ३५ दांत. ३६ दाढा. ३७ इंद्र. ३८ फांसे. ३९ मद्यपान. ४० शिर. ४१ त्रैलोक्य.

